महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी कृषि विद्यापीठास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात पुनर्विनियोजनाने उपलब्ध झालेला निधी वितरीत करण्याबाबत. (कार्यक्रम)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.**
**शासन निर्णय क्रमांक : मफुवि-१४२२/प्र.क्र.७५/७-अे,**
**दिनांक : ३१ मार्च, २०२२.**

वाचा :- (०१) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, क्रमांक पुनर्वि-२०२२/प्र.क्र.३४(३)/२-अे, दिनांक ३१ मार्च, २०२२,
(०२) नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी यांचे पत्र क्र. मफुकृवि/नियंत्रक/९१३/२०२२, दिनांक २५.०३.२०२२.

**प्रस्तावना :-**

महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी या कृषि विद्यापीठामध्ये राबविण्यात येत असलेल्या कार्यक्रमांतर्गत योजनांच्या खर्चासाठी बांधकामाकरीता रु.१६००.०० लाख अनुदान मागणी अर्थसंकल्पीत करण्याचा प्रस्ताव संदर्भ क्रमांक २ च्या पत्रान्वये शासनास प्राप्त झाला आहे. प्रस्तावास अनुसरुन निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यास अनुसरुन संदर्भ क्रमांक १ च्या शासन निर्णयान्वये “मागणी क्रमांक- डी-३, २४०१, पीकसंवर्धन (२४०१ ए२२५) , ३३ अर्थसहाय्य, केंद्रपुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजनेसाठी” अंतर्गत उपलब्ध असलेल्या सुधारीत तरतुदीतून महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी विद्यापीठास सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात "०१- पीकसंवर्धन,(००) (०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) २४१५ ००७२, ३५- भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान करीता या उपशिर्षाखाली रु.१६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त) योजनांतर्गत तरतूद पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आली आहे. सदर पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेले अनुदान वितरीत करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त प्रमाणे पुनर्विनियोजनाने उपलब्ध करुन देण्यात आलेले रु.१६,००,००,०००/- (अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त) इतके योजनाकरीताचे अनुदान खाली नमूद केलेल्या अटी व शर्तींच्या अधीन राहून तसेच शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्र “अ” प्रमाणे वितरीत करण्यास शासन मंजुरी देत आहे.

१) वरीलप्रमाणे विद्यापीठांना मंजूर करण्यात आलेले अनुदान महाराष्ट्र कृषि विद्यापीठ अधिनियम १९८३, महाराष्ट्र कृषि विद्यापीठ परिनियम १९९०, आणि महाराष्ट्र कृषि विद्यापीठ लेखा संहिता १९९१ मधील तरतूदीप्रमाणे आणि प्रचलित शासन आदेश व विहित कार्यपध्दतीनुसार सक्षम अधिका-यांची प्रशासकीय व वित्तीय मान्यता घेतल्यानंतर विहीत मर्यादेत खर्च करण्यात यावे. केवळ अर्थसंकल्पीय तरतूद आहे किंवा अनुदान वितरीत केले आहे म्हणून खर्च करु नये.
२) सदर अनुदान कोणत्याही परिस्थितीत स्वीय प्रपंजी लेख्यात /PLA बँक खात्यात ठेवता येणार नाही.
३) वरीलप्रमाणे पुनर्विनियोजनाने मंजूर करण्यात आलेले योजनेचे अनुदान सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातच खर्च करण्यात यावे.

४) यापुढे अनुदानाची मागणी करताना, विद्यापीठाने दरमहा १० तारखेपर्यंत योजनानिहाय वितरीत केलेले अनुदान, प्रत्यक्ष खर्च आणि शिल्लक अनुदान याबाबतचा अहवाल सादर करावा. तसेच पूर्वी वितरीत केलेल्या अनुदानातील शिल्लकीची प्रस्तावित मागणीशी सांगड घालून, प्रत्यक्षात आवश्यक तेवढ्याच अनुदानाची मागणी करण्यात यावी.

५) नियमबाह्य योजना पदे आणि बाबींसाठी खर्च करु नये.

२. विद्यापीठाच्या नियंत्रक आणि इतर संबंधित सक्षम प्राधिका-यांनी उपरोक्त अटी व शर्तीचे काटेकोरपणे अनुपालन करावे.

३. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर या आहरण व संवितरण अधिकारी यांनी संबंधित उपशीर्षांतर्गत पुनर्विनियोजनाद्वारे मंजूर करण्यात आलेले रु.१६,००,००,०००/- अनुदान कृषि विद्यापीठांचे संबंधित नियंत्रक यांना अदा करण्याबाबत नियमानुसार आवश्यक कार्यवाही करावी.

४. या प्रित्यर्थचा खर्च सन २०२१-२२ च्या अंदाजपत्रकात खालील लेखाशिर्षाखाली मंजूर केलेल्या तरतूदीतून मासिक निधी विवरणपत्राच्या मर्यादेत भागवावा व त्याच लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

| मंजूर अनुदान | लेखाशिर्ष |
|---|---|
| रुपये १६,००,००,०००/- | मागणी क्र. डी-३, २४१५, कृषि विषयक संशोधन व शिक्षण ०१ पीकसंवर्धन, १२०, इतर संस्थांना सहाय्य (००)(०६) महात्मा फुले कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम)<br>२४१५ ००७२<br>३५-भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान |

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १६२, १६३ व १६४ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या शक्तीनुसार तसेच नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक -१६४/१४३१/२०२२, दिनांक २८/०३/२०२२ अन्वये व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्रमांक. १३२/ २०२२/व्यय-१, दिनांक ३१/०३/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२२०३३१२३२१३१४९०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: CN = VARSHA M MEHER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2022.03.31 23:24:41 +05'30'

**( वर्षा मेहेर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

प्रति,

१. सदस्य सचिव तथा महासंचालक/सल्लागार (वित्त), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे,
२. कुलगुरु/कुलसचिव/नियंत्रक/विद्यापीठ अभियंता, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,

३. उपविभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर,
४. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),मुंबई/नागपूर,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर / उपकोषागार अधिकारी, राहुरी,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
७. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
८. उप मुख्य लेखा परिक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई,
९. वित्त विभाग (व्यय-१ / बियुडी १३), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१०. नियोजन विभाग (कार्यासन - १४३१), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
११. कक्ष अधिकारी, कार्यासन २अे / ६अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
१२. कार्यासन (७-अे (निवडनस्ती), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

## विवरणपत्र “अ”

## शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग :मफुवि-१४२२ /प्र.क्र.७५ /७-अे, दिनांक ३१.०३.२०२२.

### महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी
### “३५-भांडवली मत्तेच्या निर्मीतीकरीता अनुदान (२४१५ ००७२)”

**(रु.लाखात)**

| अ क्र. | योजनेचे नांव | सन २०२१-२२ साठी पुनर्विनियोजनाने विद्यापीठास उपलब्ध करुन द्यावयाचा अतिरिक्त निधी |
|---|---|---|
| १ | २ | ६ |
| १. | पुण्यश्लोक अहिल्यादेवी होळकर शासकीय कृषि महाविद्यालय हाळगांव,अहमदगनर. येथील इमारत व पायाभूत सुविधा बांधकाम करणे | २००.०० |
| २. | क्रांतिसिंह नाना पाटील शासकीय अन्नतंत्रज्ञान महाविद्यालय, मौजे पेठ जि. सांगली येथील इमारत व पायाभूत सुविधा बांधकाम करणे. | २००.०० |
| ३. | पुणे कृषि महाविद्यालय सभागृह बांधकाम | २००.०० |
| ४. | धुळे कृषि महाविद्यालय सभागृह बांधकाम | २००.०० |
| ५. | कोल्हापूर कृषि महाविद्यालय सभागृह बांधकाम | १००.०० |
| ६. | कृषि महाविद्यालय, राहुरी येथे पदवी विद्यार्थीनींकरीता वसतीगृह बांधकाम | १००.०० |
| ७. | मध्यवर्ती परिसर, राहुरी येथे पदव्युत्तर विद्यार्थीनींकरीता वसतीगृह बांधकाम | १००.०० |
| ८. | कृषि महाविद्यालय, पुणे येथे पदवी विद्यार्थीनींकरीता वसतीगृह बांधकाम | २००.०० |
| ९. | कृषि महाविद्यालय, कोल्हापूर येथे पदवी विद्यार्थीनींकरीता वसतीगृह बांधकाम | १००.०० |
| १० | कृषि महाविद्यालय, धुळे येथे पदवी विद्यार्थीनींकरीता वसतीगृह बांधकाम | २००.०० |
| | **एकूण** | १६००.०० |

(अक्षरी रुपये सोळा कोटी फक्त)

VARSHA M MEHER

Digitally signed by VARSHA M MEHER
DN: CN = VARSHA M MEHER, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = AGRICULTURE AND ADF DEPARTMENT
Date: 2022.03.31 23:24:55 +05'30'

**( वर्षा मेहेर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**